**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

क्रमांक: संकीर्ण २७१४/प्र.क्र. १८२/१३

मंत्रालय,मुंबई ४०० ०३२

दिनांक : २७ ऑगस्ट, २०१४

**वाचा :** १) शासन अधिसुचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही- २००४/प्र.क्र.१३६०४/१२, दिनांक २५.५.२००६

२) शासन अधिसुचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीओडी-१००७/प्र.क्र.९/१८ (र.व का.), दिनांक १४.११.२०१३

३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण २०१२/ प्र.क्र.५४/ १८ (र.व का.), दिनांक ११.८.२०१४

## कार्यालयीन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५, दि. २५.५.२००६ च्या अधिसुचनेद्वारे प्रसिद्ध करण्यात आला आहे तसेच सदर अधिनियमांतर्गत महाराष्ट्र शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध नियम, २०१३ दि. १४.११.२०१३ रोजी प्रसिद्ध करण्यात आले आहेत. सदर अधिनियमाच्या कलम ९(१) व ९(२) अन्वये प्रत्येक विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी त्यांना दुय्यम अधिकाऱ्यास अंतिम निर्णय घेण्यासाठी शक्ती प्रदान करावयाच्या आहेत. तसेच विभागाशी/ कार्यालयाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टिने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्याचे तीन स्तर निश्चित करण्याचे निदेश देण्यात आले आहेत.

त्या अनुषंगाने या कार्यासनाशी संबंधित विषयाबाबत सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे निर्णय घेण्यासाठी सादरीकरणाचे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निर्देश असल्यास किंवा काही अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य ते बदल करण्यात येतील तसेच धोरणात्मक बाबींच्या प्रकरणात दि. ११.८.२०१४ च्या परिपत्रकात नमूद केल्यानुसार सादरीकरणाचे तीनपेक्षा अधिक स्तर असतील.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४०८२७१७३३१६६००७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind Tukaram Khot

Digitally signed by Arvind Tukaram Khot
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arvind Tukaram Khot
Date: 2014.08.27 17:44:37 +05'30'

(अ.तु.खोत)

**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

प्रति,

१) प्रधान सचिव (सेवा) यांचे स्वीय सहायक,

२) उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्या १९, १२

३) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने

४) निवडनस्ती

(कार्यालयीन आदेश, सा.प्र.वि.क्र.संकीर्ण २७१४/प्र.क्र. १८२/ १३,दिनांक २७ ऑगस्ट ,२०१४ चे जोडपत्र)

**महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ९(१) व ९(२) अंतर्गत कार्यासनाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारित करणे.**

| अ.क्र. | विषय | स्तर | | | अंतिम निर्णय घेण्यास सक्षम प्राधिकारी | आदेश निर्गमित करण्यास सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय | | |
| १ | आस्थापना मंडळ क्र.१ च्या विचारार्थ प्राप्त होणारे प्रस्ताव व त्याविषयक सर्व बाबी | अवर सचिव/ उपसचिव | प्रधान सचिव (सेवा) | मुख्य सचिव | मुख्य सचिव | उप सचिव |
| २ | आस्थापना मंडळ क्र.२ च्या विचारार्थ प्राप्त होणारे प्रस्ताव व त्याविषयक सर्व बाबी | कक्ष अधिकारी/ अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(सेवा) | प्रधान सचिव(सेवा) | उप सचिव |
| ३ | खालील बाबींच्या संदर्भात खुलाशासाठी /धारणा पक्की करण्यासाठी प्राप्त होणारे अनौपचारीक संदर्भ<br>१. गोपनीय अहवाल लिहिणे व जतन करणे<br>२. विविध विद्यापीठे,अभिमत विद्यापीठे, संस्था स्वायत्त संस्था इत्यादीच्या पदविका, पदवी पदव्युत्तर पदव्यांना केंद्र शासाने | कक्ष अधिकारी | अवर सचिव | उप सचिव | उप सचिव | --- |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | प्रदान केलेली समकक्षता राज्य शासनाच्या सेवेसाठी लागू करणे.<br>३. चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीसंबंधीच्या बाबी<br>४. सेवानिवृत्त होणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्तींतर शासन सेवेत पुनर्नियुक्ती देणे/करार पद्धतीने नेमणुका देणे.<br>५. विवक्षित कामासाठी करार पद्धतीने नियुक्त्या करणेसंबंधी | | | | | |
| ४ | खालील बाबींच्या संदर्भात विभागाची मान्यता देण्यासाठी प्राप्त होणारे अनौपचारीक संदर्भ<br>१. सेवानिवृत्त होणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्तींतर शासन सेवेत पुनर्नियुक्ती देणे/करार पद्धतीने नेमणुका देणे.<br>२. विवक्षित कामासाठी करार पद्धतीने नियुक्त्या करणेसंबंधी | कक्ष अधिकारी/ अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(सेवा) | प्रधान सचिव(सेवा) | ---- |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ५ | सेवानिवृत्तीनंतर वाणिज्यिक नोकरी करण्यास अनुमती देणे | कक्ष अधिकारी/ अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(सेवा) | प्रधान सचिव(सेवा) | --- |
| ६ | राज्य पुनर्रचना कायदा, १९५६ आणि मुंबई पुनर्रचना कायदा १९६० मुळे उद्भवलेल्या आंतरराज्य कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबी | कक्ष अधिकारी/ अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(सेवा) | प्रधान सचिव(सेवा) | --- |
| ७ | कार्यासनाच्या विषयांशी संबंधित न्यायालयीन संदर्भ | कक्ष अधिकारी/ अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(सेवा) | प्रधान सचिव(सेवा) | --- |
| ८ | कार्यासनाच्या विषयांशी संबंधित न्यायालयीन प्रकरणांत विभागाच्या वतीने शपथपत्र/परिच्छेदनिहाय अभिप्राय दाखल करणे | कक्ष अधिकारी/ अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(सेवा) | प्रधान सचिव(सेवा) | --- |
| ९ | कार्यासनाच्या विषयांशी संबंधित विधीमंडळ कामकाज | कक्ष अधिकारी/ अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव(सेवा) | प्रधान सचिव(सेवा) | अवर सचिव |